पश्चिम घाट विकास कार्यक्रमांतर्गत शालेय विद्यार्थ्यांमध्ये पर्यावरण विषयक जाणिवा रुजवून त्या समृध्द करण्यासाठी विशेष इको-क्लब मार्फत अंमलबजावणी

महाराष्ट्र शासन
पर्यावरण विभाग
शासन निर्णय क्र.पघावि-२०१०/प्र.क्र.३१/२०१०/तां.क.४
मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक : २८ ऑक्टोबर, २०१०

**प्रस्तावना :**

देशातील डोंगराळ प्रदेशाच्या विकासास चालना देण्यासाठी राष्ट्रीय विकास मंडळाच्या शिफारशीनुसार १९७४-७५ या वर्षापासून महाराष्ट्र, कर्नाटक, तामिळनाडू, केरळ व गोवा या राज्यामध्ये पश्चिम घाट विकासाचा केंद्र पुरस्कृत कार्यक्रम सुरु करण्यात आला आहे. ज्या तालुक्यातील किमान २० टक्के क्षेत्र ६०० मीटर उंचीवर किंवा त्यापेक्षा जास्त उंचीवर आहे अशा क्षेत्राचा पश्चिम घाट क्षेत्रात समावेश करण्यात आलेला आहे. त्यानुसार राज्याच्या १२ जिल्हयातील ६३ तालुक्यांमध्ये पश्चिम घाट विकास कार्यक्रम राबविण्यात येत आहे.

या कार्यक्रमांतर्गत शालेय विद्यार्थ्यांमध्ये पर्यावरण विषयक जाणिवा रुजवून त्या समृध्द करण्यासाठी पश्चिम घाट क्षेत्रामध्ये विशेष इको-क्लब मार्फत अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

पश्चिम घाट विकास कार्यक्रमांतर्गत पश्चिम घाट कार्यक्षेत्रात समाविष्ट असणाऱ्या १२ जिल्हयांमधील ६३ तालुक्यांत शालेय विद्यार्थ्यांमध्ये पर्यावरण विषयक जाणिवा रुजवून त्या समृध्द करण्यासाठी विशेष इको क्लबची स्थापना करुन त्यामार्फत अंमलबजावणी करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.-

**उद्दिष्ट :**

पश्चिम घाट क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत शालेय विद्यार्थ्यांमध्ये पर्यावरण विषयक जाणिवा रुजवून त्या समृध्द करणे.

**कार्यक्रम :**

अ) विशेष इको-क्लब मार्फत प्रामुख्याने खाली नमुद केलेल्या कार्यक्रमांतर्गत शालेय विद्यार्थ्यांमध्ये पर्यावरण विषयक जाणिवा रुजवून त्या समृध्द करण्यासाठी पुढीलप्रमाणे नमूद केलेल्या कार्यक्रमाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यांत येईल.

१. पश्चिम घाट क्षेत्रातील जैवविविधतेची ओळख करुन घेऊन त्याचे संवर्धन करणे.

२. घरातील कचऱ्याची पर्यावरणास हानी न पोहोचविता योग्य तऱ्हेने विल्हेवाट लावणे

३. जैविक घनकचऱ्याचे पर्यावरणास अनुकूल असे व्यवस्थापन करणे/ विल्हेवाट लावणे.

४. पाणी, हवा आणि ध्वनी प्रदुषणाबाबत जागृती निर्माण करणे

५. झाडे लावणे व संवर्धन करणे

६. सार्वजनिक ठिकाणी स्वच्छतेच्या नियमांचे पालन.

७. घर,शाळा व आसपासच्या परिसरातील प्रदुषण वाढविण्याऱ्या गोष्टींबाबत जाणीव निर्माण करणे.

८. स्थानिक पर्यावरण सुधारणा

९. अपारंपारीक ऊर्जा स्त्रोतांचा वापर

ब. जिल्हा निहाय इको क्लब्सचे "इको मेळावे" आयोजित करणे.

क. दरवर्षी उत्कृष्ट कार्यक्रम राबविणाऱ्या पश्चिम घाट क्षेत्रातील पहिल्या ५ विशेष इको क्लबला पारितोषिक देणे.

<u>कार्यपध्दती :</u>

१.पर्यावरण संवर्धनार्थ पश्मिम घाट क्षेत्रांतर्गत १२ जिल्हयातील स्थानिक भौगोलिक परिस्थिती लक्षात घेवून पर्यावरण क्षेत्रात कार्यरत केंद्र शासनाच्या अधिपत्याखालील पर्यावरण शिक्षण केंद्रामार्फत (सेंटर फॉर एन्व्हॉयर्नमेंट एज्यूकेशन) यांच्यामार्फत विशेष इको क्लबच्या सहभागातून उपरोक्त कार्यक्रम नाविण्यपूर्ण पध्दतीने राबविण्यासाठी तसेच सुरवातीला ३०० स्वतंत्र विशेष इको क्लबस् निर्माण करण्यासाठी प्रस्ताव मागविण्यांत येतील. तद्नंतर विशेष इको क्लबची संख्या १००० पर्यंत वाढविण्याचा प्रयत्न करण्यांत येईल.

२. राष्ट्रीय हरीत सेना या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत पश्चिम घाट क्षेत्रात स्थापित न झालेल्या ठिकाणी तसेच राष्ट्रीय हरीत सेनेच्या मार्गदर्शक सुचनांत समाविष्ट नसलेल्या शाळांमध्ये (जसे आदिवासी निवासी आश्रम शाळा) तसेच **<u>मान्यता प्राप्त शाळांमध्ये / महाविद्यालयांमध्ये विशेष इको-क्लब स्थापन करण्यांत येतील.</u>**

३. उपरोक्त नमूद कार्यक्रमांपैकी अधिकाधिक कार्यक्रम हे शक्यतो लोकाभिमुख करण्याबाबत तसेच सदर कार्यक्रमांतर्गत अधिकाधिक लोकांचा सहभाग वाढविण्यासाठी विशेष इकोक्लबस् मार्फत अंमलबजावणी करण्यात येईल.

14 2601-130

४. पश्चिम घाट क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत १२ जिल्हयांमध्ये स्थापन केलेल्या विशेष इको-क्लब मार्फत राबविण्यांत आलेल्या वार्षिक कार्यक्रमाच्या कामगिरीचे मुल्यमापन करुन जिल्हानिहाय सर्वोत्तम इको-क्लब ला पारितोषिक देण्यासाठी उपरोक्त संस्थेमार्फत प्रस्ताव मागविण्यांत येतील.

५. सदर प्रस्ताव मागविण्यासाठी राज्यातील प्रमुख मराठी व इंग्रजी वर्तमानपत्राद्वारे जाहिरात देण्यात येईल.

६. योजनेचे संक्षिप्त स्वरुप, प्रकल्पाचे विषय, योजनेची मार्गदर्शक तत्वे, प्रस्तावाचे प्रारुप नमुने, इत्यादी विभागाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात येईल.

७. उपरोक्त पध्दतीने विभागाकडे प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांपैकी अंतिम निवड पर्यावरण विभाग व नियोजन विभाग संयुक्तपणे करतील.

८. यासाठीचा समन्वय साधणारी अंमलबजावणी यंत्रणा पर्यावरण विभाग व नियोजन विभाग अंतिम करतील.

९. नियोजन विभागामार्फत उपलब्ध निधी पर्यावरण विभागाच्या सहमतीने व निश्चित केलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार उपलब्ध करुन देण्यात येईल.

१०. सुकाणू समितीची रचना खालीलप्रमाणे असेल -

| | | |
|---|---|---|
| सचिव (पर्यावरण) | .. | अध्यक्ष |
| सह/उप सचिव (वित्त) | .. | सदस्य |
| सह/उप सचिव (नियोजन) | .. | सदस्य |
| सह/उप सचिव (अर्थसंकल्प), पर्यावरण | .. | सदस्य |
| विशेष निमंत्रित सदस्य (दोन) | .. | सदस्य |
| शास्त्रज्ञ-१, पर्यावरण (तां.क.४) | .. | सदस्य सचिव. |

८. जिल्हानिहाय सर्वोत्तम इको-क्लबला पारितोषिक देण्यासाठी सादर केलेल्या प्रस्तावावर अंतिम निर्णय सुकाणु समिती तर्फे घेण्यात येऊन पहिल्या पाच विशेष इको क्लबला पारितोषिक देण्यासाठी शिफारस करेल तसेच गत वर्षीच्या कामगिरीचा आढावा घेणे, आवश्यक असल्यास, योजना राबविण्याच्या कार्यपध्दतीमध्ये सुधारणा सुचविणे, पुढील वर्षी राबविण्यात येणाऱ्या प्रस्तावित कार्यक्रमाचे उदिष्ट निश्चित करणे, त्याच्या प्रभावी अंमलबजावणी साठी उपाययोजना करुन उचित मार्गदर्शन करणे इत्यादी बाबी सुकाणु समितीमार्फत हाताळण्यांत येतील.

**<u>वित्तीय बाब :</u>**

उपरोक्त कार्यक्रमासाठी नियोजन विभाग, पश्चिम घाट विकास कार्यक्रमांतर्गत प्राप्त एकूण निधीतून दरवर्षी आवश्यक तो निधी वितरीत करेल. सदर निधीचे वितरण हे पर्यावरण विभागामार्फत अंमलबजावणी करणाऱ्या संस्थेद्वारा विशेष इको क्लबला (शाळांना) वितरीत करण्यात येईल. प्रत्येक विशेष इको क्लबला दरवर्षी रुपये १०,०००/- (रुपये दहा हजार

फक्त) इतका निधी एकरकमी आर्थिक वर्षाच्या सुरुवातीला प्रदान करण्यांत येईल. शासनाने वेळोवेळी उपलब्ध करुन दिलेल्या विवरणपत्रात खर्चाच्या आर्थिक व भौतिक उद्दिष्टांचा अहवाल संस्थेने उपलब्ध करुन द्यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाचे सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०/२०१०, दिनांक २८.१०.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येते आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्र. २०१०१०२८१९१३०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार,

**(वल्सा आर. नायर सिंह)**
**सचिव (पर्यावरण), महाराष्ट्र शासन**

प्रत

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव
३) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय
४) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
६) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
७) सर्व विभागीय आयुक्त (पश्चिम घाट क्षेत्र)
८) सर्व जिल्हाधिकारी (पश्चिम घाट क्षेत्र)
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) महा.१, महा-२, मुंबई/नागपूर
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२) उप सचिव (वित्त विभाग/व्यय-१६) समिती सदस्य
१३) उप सचिव (नियोजन विभाक/कार्या-१४८३), समिती सदस्य
१४) वित्त विभाग (अर्थ-१९/व्यय-१६) मंत्रालय, मुंबई,
१५) नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई,
१६) सर्व उप सचिव, पर्यावरण विभाग,
१७) निवड नस्ती/तां.क.४

प्रत - आवश्यक कार्यवाहीस्तव
प्रोग्राम डायरेक्टर, सेंटर फॉर एन्व्हॉयरन्मेंट एज्यूकेशन, सेंट्रल रिजनल सेल, ए-१०, गार्डन इस्टेट, १६७/१, नाग्रास रोड, औंध, पुणे-४११ ००७

- - - - - -

H 2601 - 2 %-

*Paryavarn Kriti Paschim Ghat.revised2.doc*